प्रमुख खनिजाबाबत खनिज सवलती मंजूर करणेचे अनुषंगाने e-auction लिलाव प्रक्रीया पार पाडण्यासाठी शासन स्तरावर समिती गठीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**उद्योग, उर्जा व कामगार विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः एमएनजी-०८१५/ प्र.क्र.८२/उद्योग-९**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

तारीख: ०६ ऑक्टोबर, २०१५

**प्रस्तावना -**

प्रमुख खनिजांसदर्भात विविध खनिज सवलती (खनिपट्टा, संयुक्त खनिपट्टा (पूर्वेक्षण अनुज्ञप्ती खनिपट्टा) खाण व खनिजे (विकसन व विनियमन) सुधारणा अधिनियम -२०१५ चे कलम १० (ब) ४ नुसार लिलाव प्रक्रिया (e-auction) अवलंबून मंजूर करावयाचे आहेत. याबाबत केंद्रीय खनिकर्म मंत्रालय, नवी दिल्ली यांनी दि.२० मे २०१५ अधिसूचना अन्वये खनिज लिलाव नियम २०१५ निर्गमित केले आहेत. प्रस्तुत खनिज लिलाव नियम २०१५ अन्वये विविध खनिजांच्या खनिज सवलती लिलावाद्वारे वाटप करण्याची कार्यपध्दती व मार्गदर्शक तत्वे विहित करण्यात आले आहेत. त्यानुसार राज्यातील विविध खनिजांच्या खनिज सवलती मंजूरीची प्रक्रीया पारदर्शक जलद व सुलभ करुन लिलाव प्रक्रीया यशस्वीरित्या राबविणेसाठी खनिज सवलतींचे अर्ज तपासणे व शासनास योग्य ते मार्गदर्शन करण्यासाठी राज्य स्तरीय खनिज समन्वय व शक्तीप्रदान समिती व लिलाव प्रक्रीयेद्वारे खाणपट्टा वाटप झाल्यानंतर सर्व परवाने व ना-हरकती तातडीने व सुलभतेने प्राप्त करण्यासाठी खनिज सहाय्यता कक्ष स्थापन करण्याची आवश्यकता दिसुन येते.

**शासन निर्णय-**

राज्यातील विविध खनिजांच्या संदर्भात खनिज सवलत प्रस्तावांची छाननी करुन राज्य शासनास संगणकीय लिलाव प्रक्रीया सुलभ व पारदर्शक रित्या पार पाडण्याकरिता सल्ला व मार्गदर्शन करण्यासाठी प्रधान सचिव (उद्योग) यांच्या अध्यक्षतेखाली राज्यस्तरीय खनिज समन्वय व शक्तीप्रदान समितीची रचना:-

| अ.क्र. | पदनाम | दर्जा |
|---|---|---|
| १ | प्रधान सचिव (उद्योग) | अध्यक्ष |
| २ | प्रधान सचिव (व्यय)वित्त विभाग | सदस्य |
| ३ | संचालक, भूविज्ञान व खनिकर्म, नागपूर | सदस्य |
| ४ | उप सचिव (उद्योग) | सदस्य सचिव |

**राज्य स्तरीय खनिज समन्वयय व शक्तीप्रदान समितीची कार्यकक्षा :-**

शासन स्तरावर विविध खनिजांच्या लिलावाची प्रक्रीया संगणकीय प्रणालीद्वारे सुलभ व पारदर्शक पध्दतीने पार पाडण्यासाठी सल्लागार समितीची कार्यकक्षा खालील प्रमाणे राहिल.

१) राज्यातील विविध प्रमुख खनिजांच्या खनिज सवलती लिलावाद्वारे वाटप करणेच्या अनुषंगाने विविध खनिज खंडाची तयारी व प्रगतीबाबत सर्व यंत्रणांमध्ये समन्वय व आढावा घेणे

२) राज्यातील विविध खनिजांच्या खनिज सवलती लिलावाद्वारे वाटप करण्यासाठी आवश्यक असल्यास तांत्रिक / व्यवहार /विधी सल्लागारांची नियुक्ती करणे.

३) खनिज लिलावासाठी लिलाव सुविधा पुरवठादारांची नियुक्ती करणे व त्याबाबत निर्णय घेणे.

४) लिलाव प्रक्रीयेसाठी अधिकृत इ-मेल व शासनाचे अधिकृत पत्रव्यवहाराबाबत पत्ता निश्चित करणे .व या कामी शासनाच्या वतीने अर्ज स्वीकारणेकरिता प्राधिकृत अधिकारी निश्चित करणे ज्याद्वारे लिलावातील प्राप्त दस्तऐवज स्वीकारण्यात येतील.

५) लिलावदरम्यान तांत्रिक अडचणी उद्भवल्यास लिलाव प्रक्रीयेचा कालावधी वाढविणेसंदर्भात निर्णय घेणे.

६) पात्र लिलावधारकाने सादर केलेल्या Price Offer च्या शेकडा दराने कमीत कमी किती प्रमाणात वाढ करणे योग्य राहील याबाबत निर्णय घेणे.

७) लिलाव प्रक्रीयेद्वारे प्रथम व द्वितिय टप्प्यावर विविध निकषणावर पात्र व यशस्वी बोलीधाराकाची शिफारस शासनास करणे.

८) लिलाव प्रक्रीये दरम्यान लिलाव दस्तऐवजाचे दर )Tender document rate) निश्चित करणे व सुरक्षा अनामत रक्कम (Bid Security Amount)निश्चित करणे.

९) लिलावासाठी आरक्षीत किंमत (reserve price) निश्चित करणे .

**सहय्यता कक्ष:-**

लिलाव प्रक्रीयेद्वारे खाणपट्टा वाटप झाल्यानंतर सर्व परवाने व ना-हरकती तातडीने व सुलभतेने प्राप्त करण्यासाठी खालील प्रमाणे खनिज सहाय्यता कक्ष स्थापन करण्यात येत आहे:-

| अ.क्र. | पदनाम | दर्जा |
|---|---|---|
| १ | प्रधान सचिव (उद्योग) | अध्यक्ष |

| अ.क्र. | पदनाम | दर्जा |
|---|---|---|
| २ | प्रधान सचिव (महसूल) | सदस्य |
| ३ | प्रधान सचिव (वने) | सदस्य |
| ४ | सदस्य सचिव, महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळ | सदस्य |
| ५ | जिल्हाधिकारी संबधित जिल्हा | अमंत्रित सदस्य |
| ६ | संचालक, भूविज्ञान व खनिकर्म | सदस्य सचिव |

**सहय्यता कक्ष:-**

१. लिलाव पध्दतीद्वारे वाटप झालेल्या विविध खनिज सवलतीधारकांना खाणकाम जलद व सुलभतेने सुरु करण्यासाठी विविध ना-हरकती व परवाने प्राप्त करण्यासाठी सहाय्य करणे.
२. यशस्वी बोलीधारकांना खाणपट्टा निष्पादनासाठी सहाय्य व तक्रार निवारण करणे.
३. यशस्वी बोलीधारकांकडून प्राप्त करावयाच्या रक्कमांबाबत पाठपूरावा करणे, दंड आकारणी व विलंब शुल्क आकारणी करणे.

उपरोक्त समित्यांच्या बैठका प्रधान सचिव (उद्योग) यांच्या निर्देशानुसार आवश्यकते प्रमाणे आयोजित करण्यात येतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१००७११४४१८५६१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay Shankarrao Ingle

Digitally signed by Sanjay Shankarrao Ingle
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industry Energy & Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sanjay Shankarrao Ingle
Date: 2015.10.09 12:42:57 +05'30'

**( संजय इंगळे )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) अपर मुख्य सचिव (वने) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
२) प्रधान सचिव (महसूल) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई

३) मा.मुख्यमंत्री यांचे सचिव , मंत्रालय, मुंबई
४) मा.मंत्री (खनिकर्म) , मंत्रालय, मुंबई
५) मा.राज्यमंत्री (खनिकर्म) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६) प्रधान सचिव (उद्योग व खनिकर्म) यांचे स्वीय सहाय्यक
७) मुख्य वन संरक्षक, नागपूर
८) संचालक, भूविज्ञान व खनिकर्म संचालनर
९) सदस्य सचिव, महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळ.